सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांच्या मंजूरी व निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय (शुध्दीपत्रक) क्रमांक : सावियो-२०१९/प्र.क्र.१५०/अजाक**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १२ मार्च, २०२०.

वाचा : १. शासन निर्णय, क्रमांक: दवसू-२०१५/प्र. क्र. ३४७/अजाक, दिनांक ०९ मार्च, २०१८.

२. शासन निर्णय, क्रमांक: सावियो-२०१८/प्र. क्र. २३२/अजाक, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१८.

३. शासन निर्णय (शुध्दीपत्रक), सम क्रमांक, दिनांक २४ जुलै,२०१९.

**प्रस्तावना:**

राज्यातील ग्रामीण व नागरी क्षेत्रातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्ती/गावांचा विकास करण्यासाठी या घटकांना मुलभूत सुविधा पुरविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांना शासन स्तरावरुन मान्यता देऊन या योजनेंतर्गत घ्यावयाची कामे, अंमलबजावणी यंत्रणा व इतर निकष निश्चित करण्यासाठी "भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना" सन २०१८-१९ पासून राबविण्याचा निर्णय शासनाने उपरोक्त वाचा १ येथील शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. त्यानुसार मा.लोकप्रतिनिधींनी (आमदार/खासदार) सुचविलेल्या ग्रामीण व नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यामधील कामांना शासनाने उपरोक्त वाचा २ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर वाचा २ येथील शासन निर्णयात कांही लोकप्रतिनिधींच्या बदल करण्याच्या विनंतीअन्वये शासन मान्यतेने शुध्दीपत्रक उपरोक्त वाचा ३ अन्वये काढण्यात आलेले आहे. सदर वाचा ३ येथील शासन निर्णय (शुध्दीपत्रक) यास शासन मान्यतेने शुध्दीपत्रक काढण्यात येत आहे.

**शुध्दीपत्रक:**

उपरोक्त वाचा ३ मधील दिनांक २४ जुलै,२०१९चा शासन निर्णय (शुध्दीपत्रक) मधील जिल्हा परभणीच्या सहपत्र/विवरणपत्रामध्ये पुढीलप्रमाणेचा बदल केलेला तपशील या शुध्दीपत्रकान्वये रदद करण्यात येत आहे:

(रुपये लाखात)

| अनुक्रमांक | कामाचे नाव | अंदाजित किंमत रुपये | वितरीत तरतूद रुपये |
|---|---|---|---|
| ७. | शेवडी, ता. जिंतूर येथे सी. सी. रस्ता व पेव्हर ब्लॉक बसविणे. | ८.०० | ३.२० |
| ९. | नांदगांव दूधना, ता. जिंतूर येथे सी. सी. रस्ता करणे. | ८.०० | ३.२० |

याऐवजी सुधारीत तपशील पुढीलप्रमाणे राहिल:

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत रुपये | वितरीत तरतूद रुपये |
|---|---|---|---|
| ७. | केहाळ, ता. जिंतूर येथील अनुसुचित जाती वस्तीमध्ये अभ्यासिका करणे. | ८.०० | ३.२० |
| ९. | माक, ता. जिंतूर येथे अनुसूचित जाती वस्तीमध्ये अभ्यासिका करणे. | ८.०० | ३.२० |

२. सदर वाचा ३ येथील शासन निर्णय (शुध्दीपत्रक), दिनांक २४ जुलै,२०१९अन्वये बदल करण्यात आलेल्या कामांबाबत संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण आणि/किंवा संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून सदर वाचा २ येथील शासन निर्णय, दिनांक १२ नोव्हेंबर,२०१८ प्रमाणे जर कार्यवाही सुरु करण्यात आलेली असेल तर असा बदल करता येणार नाही/करण्यात येऊ नये.

३. सदर शुध्दीपत्रकासाठी सर्व बाबी/कार्यपध्दती सदर शुध्दीपत्रकाचा मूळ शासन निर्णय, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१८ प्रमाणेच राहिल.

सदर शासन निर्णय (शुध्दीपत्रक) महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००३१८१८१३४१२७२२ असा आहे. हा शासन निर्णय (शुध्दीपत्रक) डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil D Sardar

Digitally signed by Sunil D Sardar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, cn=Sunil D Sardar
Date: 2020.03.18 18:16:47 +05'30'

**( सुनिल सरदार )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१.मा. राज्यपाल, महाराष्ट्र यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्य मंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री, महसूल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५.मा.मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६.मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७.मा.मंत्री, अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८.मा.राज्य मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१०.मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.मा. प्रधान सचिव (सामाजिक न्याय),सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२.आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

१४.सर्व जिल्हाधिकारी

१५.सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग.

१६.सर्व सहाय्यक आयुक्त,समाज कल्याण.

१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.